**<u>प्रशासकीय मान्यता</u>**
**नगर दिवाणी व सत्र न्यायालय, दिंडोशी, गोरेगाव, मुंबई या न्यायालयीन इमारतीतील नवीन कोर्ट हॉल क्र. १४, १५ व १६ करीता फर्निचरचा पुरवठा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. सीसीबी-१११९/प्र.क्र.६६/का-१३.**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २६ फेब्रुवारी, २०२०.

**<u>पहा</u> :-** १) प्रबंधक (निरिक्षणे-२), मा. उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे क्र.बी (डब्ल्यू) ६०४१/१९८७/१४९२/२११२२, दिनांक ३ जुलै, २०१९.
२) मुख्य न्यायाधीश, मुंबई शहर दिवाणी न्यायालय आणि सत्र न्यायाधीश, मुंबई यांचे पत्र क्र.बीयुआयएलडी/ २९८१/१६६९०/२१/५/२०१९, दिनांक ९ मे, २०१९.

**<u>प्रस्तावना :-</u>**

उपरोक्त संदर्भाधीन पत्रान्वये नगर दिवाणी व सत्र न्यायालय, दिंडोशी-गोरेगाव, मुंबई या न्यायालयीन इमारतीतील कोर्ट हॉल क्र. १४, १५ व १६ करीता फर्निचर पुरविणेबाबतचा प्रस्ताव मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्याकडून शासनास सादर करण्यात आलेला आहे. सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

नगर दिवाणी व सत्र न्यायालय दिंडोशी-गोरेगाव, मुंबई येथील न्यायालयीन इमारतीतील कोर्ट हॉल क्र. १४, १५ व १६ करीता फर्निचर पुरविणेकरिता अनुक्रमे रु.२३,९८,६१५.०० (रु. तेवीस लक्ष अठ्ठ्याण्णव हजार सहाशे पंधरा फक्त), रु.२४,०२,९३३.०० (रु. चोवीस लक्ष दोन हजार नऊशे तेहतीस फक्त) व रु.२४,०१,४९४.०० (रु. चोवीस लक्ष एक हजार चारशे चौऱ्याण्णव फक्त) इतक्या अंदाजित किमतीस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर बाबतचा तपशील पुढीलप्रमाणे :-

| अ.क्र. | तपशील | प्रशासकीय मान्यता रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | कोर्ट हॉल क्र. १४ करिता फर्निचर | २०,४८,२७७.२४ |
| २ | आकस्मिक खर्च ४% | ८१,९३१.०९ |
| ३ | वस्तू व सेवा कर १२% | २,६८,४०६.२५ |
| | एकूण | २३,९८,६१४.५८ |
| | म्हणजेच रक्कम रुपयात | २३,९८,६१५.०० |

| अ.क्र. | तपशील | प्रशासकीय मान्यता रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | कोर्ट हॉल क्र. १५ करिता फर्निचर | २०,५१,९६४.६७ |
| २ | आकस्मिक खर्च ४% | ८२,०७८.५९ |
| ३ | वस्तू व सेवा कर १२% | २,६८,८८९.४५ |
| | एकूण | २४,०२,९३२.८४ |
| | म्हणजेच रक्कम रुपयात | २४,०२,९३३.०० |

| अ.क्र. | तपशील | प्रशासकीय मान्यता रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | कोर्ट हॉल क्र. १६ करिता फर्निचर | २०,५०,७३५.५२ |
| २ | आकस्मिक खर्च ४% | ८२,०२९.४२ |
| ३ | वस्तू व सेवा कर १२% | २,६८,७२८.३८ |
| | एकूण | २४,०१,४९३.७५ |
| | म्हणजेच रक्कम रुपयात | २४,०१,४९४.०० |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(अ) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

(ब) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घेण्यात यावे.

(क) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र. १७७/तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

(ख) काम सुरु करण्यापूर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

(ग) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय, क्र.बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

(घ) फर्निचरच्या बाबी तसेच मांडणीबाबत उपभोक्ता विभागाच्या वतीने प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश यांची मान्यता घेतल्यानंतरच निविदा कार्यवाही करावी.

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च- ०१, कार्यालयीन इमारती- ०५१, बांधकाम - (०३) न्यायदान (केंद्र पुरस्कृत योजना-राज्य हिस्सा) (०३) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) ५३-मोठी बांधकामे (४०५९ ०६७२) व (२१) न्यायदान (केंद्र पुरस्कृत योजना-केंद्र हिस्सा) (२१) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) ५३- मोठी बांधकामे (४०५९ १२२२)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **<u>अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.</u>**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४०४/१९/इमा-२, दिनांक १७ सप्टेंबर, २०१९ अनुसार त्या विभागाच्या सहमतीने व नियोजन विभागाचे परिपत्रक, क्र.ससामा-२०१०/प्र.क्र.४८/(भाग-१)/१४४३, दिनांक ११ जून, २०१८ आणि वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/ २०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-५, अ.क्र. १ व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२६१७०४०२५७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Uday Balkrishna Shukla

Digitally signed by Uday Balkrishna Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25569b2f94f1c4543dd14cfd7554a74f343a754d96291ae76706a168af42cab3, serialNumber=7b8594c3caa0542cc27f913c48e1f9c0084209e339cce7fd9de455fe24a26bbb, cn=Uday Balkrishna Shukla
Date: 2020.02.26 17:06:07 +05'30'

**( उदय बा. शुक्ल )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. मा.सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
५. मुख्य न्यायाधीश, मुंबई शहर दिवाणी न्यायालय आणि सत्र न्यायाधीश, मुंबई
६. प्रबंधक (निरीक्षणे-२), उच्च न्यायालय, अपिल शाखा , मुंबई,
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
८. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अंधेरी, मुंबई.
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उत्तर मुंबई सार्वजनिक बांधकाम विभाग, प्रशासकीय इमारत, सहावा मजला, भवन्स कॉलेज जवळ, दादाभाई मार्ग, अंधेरी (प.) मुबई ४०० ०५८. (मुळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
१०. उप विभागीय अधिकारी, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, अंधेरी, मुंबई.
११. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१२. वित्त विभाग/व्यय-५,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१३. नियोजन विभाग/का. १४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४. अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२.
१५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१६. कक्ष अधिकारी, का.-७,११,१२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१७. निवडनस्ती / संग्रहार्थ कार्या-१३.